# काय म्हणतां ?

( नाट्यछटासंग्रह )

लेखक

प्रो० विनायक सदाशिव गोगटे, एम्. ए.

तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक, बाहाउद्दिन कॉलेज, जुनागड.

प्रकाशक

केमकर आणि मंडळी,

विठ्ठलभाई पटेल रोड, मुंबई नं. ४.

प्रथमावृत्ति ] किंमत ६ आणे. [ मे १९४०

# ह वा पा ल ट

माझ्या तात्त्विक व गंभीर वाङ्मयक्षेत्रांतून थोडा थारेपालट व्हावा म्हणून मी या नाट्यछटांच्या प्रांतांत पाऊल टाकीत आहें—किंवा आक्रमण करीत आहें असें म्हटलें असतां अधिक शोभेल. पुण्याचा मनुष्य मुंबईस गेला तरी त्या हवेंत त्याला दोन दिवस बरें वाटतें. त्याचप्रमाणें या हवा-पालटानें वाचकांना थोडी विश्रांति मिळून ते माझी यापुढील तात्त्विक साहित्यसेवा ग्रहण करण्यास ताजेतवाने होतील अशी आशा आहे.

प्रस्तुत नाट्यछटांतील प्रसंग अगर विचार यांत नवीन असें कांहींच नसून ते सर्वांच्या रोजच्या परिचयाचेच आहेत. वस्तु रोजच्या परिचयाच्या असल्या तरी त्यांच्या मिश्रणाला थोडी नवीन चव येते. तशी या संग्रहाला प्राप्त झाल्यास त्यास खर्च केलेला कागद व शाई कारणीं लागलीं असें मला वाटेल.

या नाट्यछटांपैकीं 'तुम्हीच सांगा वेळ कुठला आणूं!' 'तुमची गोष्ट अगदींच निराळी!' व 'असले चाळे मला नाहीं खपायचे!' या नाट्य-छटांचे प्रयोग ऑल् इंडिया रेडियोच्या मुंबई केंद्रांतून ता. २९ डिसेंबर १९३९ रोजीं करण्यांत आले होते. 'म्हटलं थोडा चहा घेऊन गेलां अस-तात म्हणजे—' ही नाट्यछटा स्त्री मासिकाच्या जानेवारी १९३९ च्या अंकांत प्रसिद्ध झाली होती.

हा संग्रह प्रकाशित केल्याबद्दल श्री. केमकर यांचे, व त्यांतील सुंदर चित्रांबद्दल श्री. गुर्जर यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

बाहाउद्दिन कॉलेज,
जुनागड.
ता. २५ मे १९४०

वि. स. गोगटे

# अनुक्रमणिका


१ साभार परत ! .... .... १—७
२ बोले तैसा चाले ! .... .... ८—११
३ आमचा माल चोख ! आमच्या किंमती माफक ! १२—१७
४ तुम्हांला येवढं समजायला पाहिजे ! .... १८—२३
५ म्हटलं उगीच नाहीं इंद्रभुवन नांव दिलं ! २४—३०
६ असले चाळे मला नाहीं खपायचे ! .... ३१—३५
७ अहो ! तुमची गोष्ट अगदींच निराळी ! ३६—३९
८ म्हटलं थोडा चहा घेऊन गेलां असतां म्हणजे—४०—४५
९ तुम्हीच सांगा, वेळ कुठला आणूं ? .... ४६—५०
१० मी होतों म्हणून दंडावर निभावलं ! .... ५१—५५

# १ साभार परत !

कसं काय, माधवराव ? येवढा कशांत गर्क झालों आहे म्हणतां ? अहो, आम्ही लेखक दुसऱ्या कशांत गर्क होणार ? पाहिलांत का हा पत्रांचा अन् बुकपोस्टांचा ढिगारा ? अहो, महाराष्ट्रांत असं एकहि मासिक किंवा वर्तमानपत्र नाहीं कीं ज्याचं मला रोज पत्र येत नाहीं. काय, हीं बुकपोस्टं कसलीं येवढीं म्हणतां ? असतील झाले नमुन्याचे अंक ! काय, परत आलेले लेख असतील म्हणतां ? वा ! हीच का माझी पारख केलीत आपण ? माझ्यासारख्या लेखकाचे लेख मिळायला सात जन्माचं पुण्य पाहिजे या संपादकांजवळ ! आहांत कुठं ? हीं सगळीं पत्रं वाचायला मला आतां एक कारकूनच ठेवावा लागणार आहे. चला, आतां टपाल तरी पाहूं या. हें कुणाचें पत्र ? तेज मासिकाच्या संपादकांकडून आलेलं दिसतं आहे. आणखी एकादा लेख हवा असेल गुलामाला ! काय म्हणताहेत संपादक महाशय ? "आपला 'मांजरें दूध कशीं पितात ?' हा लेख इतका

तेजस्वी आहे कीं आमच्या तेज मासिकाच्या वाचकांचेहि डोळे त्यानें दिपून जाऊन त्यांना आमचे इतर लेख दिसेनासे होतील, म्हणून तो साभार परत धाडीत आहे." कां ? आहे कीं नाहीं माझ्या लेखाचा प्रभाव ! उगीच नाहीं मी आपल्याला काजवा हें टोपण नांव घेतलं ! माझ्या लेखाचं तेज ह्या खत्रुड मासिकाला अन् त्याच्या आंधळ्या वाचकांना कोठून सहन होणार ? पण बिचाऱ्या संपादकानं आपला कमकुवतपणा प्रांजलपणें कबूल केलान् हें काय थोडं झालं ? बरं, हें दुसरं पत्र कुणाचं ? ज्ञानरवि पत्राचं वाटतं ? काय बरळताहेत हे राजेश्री ? "आपल्या 'माझी सदाशिवपेठच्या हौदावरील आंघोळ' ह्या लेखांतील गाढ विद्वत्ता ग्रहण करण्याइतके आमचे वाचक प्रगल्भ बुद्धीचे नाहींत. आमचं पत्र व त्याचे वाचकहि अजून बाल्यावस्थेंत आहेत. सबब आपला लेख साभार परत करीत आहों." बरोबरच आहे. अहो, माझे लेख समजायला अजून या लेकाचांना चार शतकं लागतील ! म्हणच आहे ना मुळीं, कीं महापुरुषांचं महत्त्व ते मेल्यानंतरच जगाला पटतं. थांबा म्हणावं आतां मी मरेपर्यंत. तुमच्या नशिबींच नाहीं त्याला मी काय करणार ? आतां हे तिसरे शहाणे. काय त्यांच्या मासिकाचें नांव तें ? अहो, माझा इतक्या थोरल्या मासिकाशीं संबंध येतो कीं, त्यांचीं नांवं दिखील लक्षांत राहात नाहींत माझ्या. हो. हिमाचल मासिक.

हे काय लिहितात? "आम्ही तुमची 'केरसुणीस' ही कविता मोठ्या आनंदानं"—हो हो! व्हायचाच आनंद! फुकट कविता मिळते आहे, मग कां नाहीं होणार आनंद? काय, पुढें वाचूं म्हणतां? वाचतों हं. "आम्हीं तुमची कविता मोठ्या आनंदानं छापली असती, पण सध्यां फालतू मजकुराची फार गर्दी असल्यामुळें त्या गर्दींत आपल्यासारख्या श्रेष्ठ कवींची कविता गुदमरून टाकणें आम्हांस गैरशिस्त वाटतें." पाहिलंत का माधवराव? कसे सगळे संपादक माझ्याजवळ पटापट कबुलीजबाब देताहेत ते! पुढं काय म्हणताहेत ऐका. "पुढें योग्य वेळीं जेव्हां मासिकांत बरीच ऐसपैस जागा असेल तेव्हां तुमची कविता अवश्य छापूं. पण तोंपर्यंत ती कदाचित् आमच्या हातून गळफटेल म्हणून ती साभार परत धाडीत आहों." अहो! चक्क आभार मानले आहेत यांनीं माझे! उगीच नाहीं म्हटलं! महाराष्ट्राचा सुप्रसिद्ध काजवा आहे हा! काय म्हणतां? तो नुसता शिष्टाचार आहे? छे हो! असं कसं म्हणतां? तुमचे नाहीं कोठें त्यांनीं आभार मानले ते? अहो! मी कविता धाडली, ती त्यांना फार आवडली, इतकी आवडली कीं तिला चांगली प्रशस्त जागा देण्याचंहि त्यांनीं ठरवलं आहे, म्हणूनच त्यांनीं माझे आभार मानले ना? तुमचा स्वभाव कीं नाहीं, भारीच संशयी बुवा! बरं तें जाऊं द्या. आतां हे नाट्यकलोत्कर्ष मंडळींच्या



' पुन्हां कोणताहि लेख धाडण्याची तसदी घेऊं नये. '

चालकांचं पत्र वाचूं या. काय तारे तोडले आहेत यांनीं ? "आपलें 'एकच तांब्या' हें नाटक इतकें सरस व हृदयविदारक आहे कीं तें उठावदार रीतीनें रंगभूमीवर आणण्याची धमक आमच्या नाटक मंडळींतील कोणत्याच पात्राचे आंगीं नाहीं. आपल्या नाटकाचा रसभंग निष्कारण आमच्या पात्रांच्या हातून होऊं नये म्हणून तें परत करीत आहों." शाबास ! याला म्हणावं शरणचिठ्ठी ! अहो, येवढ्या मोठ्या नाटक मंडळीचा मालक ! महिन्याला हजारों रुपये मिळवितो, पण माझ्यापुढें कशी अगदीं नांगी टाकलीन्. नाटकाला कधीं पास मागितला तर द्यायचा नाहीं, अन् आतां कसा दातीं तृण धरून लिहितो आहे मला ! अहो, खऱ्या कलावंतांची कलाकृति रंगवायला तसेच जातिवंत कलावंत पाहिजेत ! या भिकार नाटक मंडळीच्या गचाळ पात्रांना तें काय साधणार ? कां हो ? फारसे हसतां आहांत ? माझं बोलणं तुम्हांला विनोदी वाटतं आहे वाटतं ? अहो, आमच्यासारखे प्रतिभावान् लेखक सहज बोलले तरी तें उतरवून घ्यावं असं असतं. विनोद तर काय माझ्या हातचा मळ ! कां निघालांत वाटतं ! अहो, हें शेवटचं एक पत्र तरी वाचून जा. हे नर्मदा साप्ताहिकाचे संपादक काय कबुलीजबाब देताहेत मला, तें तेवढं पाहून जा. साप्ताहिकाला दहावं वर्ष लागतं आहे ना परवां ? त्या

समारंभाला अध्यक्ष व्हा म्हणून विनंति केली असेल मला! काय म्हणतात हे ? " आपला ' माझ्या वाङ्मयक्षेत्रांतील अपूर्व यशाचें रहस्य ' हा लेख अगदीं गचाळ असल्यामुळं तो आमच्या साप्ताहिकाचे ऐवजीं आपल्या केराच्या टोपलींतच अधिक शोभेल ! " काय अरसिक अन् अडाणी मनुष्य आहे हा ! काय म्हणतां ? तो स्पष्टवक्ता आहे ? अहो, स्पष्टवक्ता कस्चा कपाळाचा ? आपल्याला लेखाचं मर्म समजण्याची अक्कल नाहीं तर गप्प बसावं ! उगीच माझ्यासारख्या लेखकाला गचाळ म्हणणं म्हणजे काय ? पण पुढं पाहिलंत कां माधवराव काय लिहिलं आहेन् तें ? ' लेख परत धाडतांना फार दिलगिरी वाटत आहे. ' चांगलाच पश्चात्ताप झालेला दिसतो आहे त्याला या वाक्या-वरनं. अरे बाबा, येवढं वाईट वाटायचं काय कारण आहे ? तुला एवढी दिलगिरी वाटत असेल तर पुन्हां पाठवतों तोच लेख तुला ! मला कांहीं एवढा राग नाहीं तुझ्या लिहिण्याचा. काय, शेवटचं वाक्य वाचूं म्हणतां ? ' पुन्हां कोणताहि लेख धाडण्याची तसदी घेऊं नये.' अडलं आहे कुणाचं खेटर तुझ्या त्या भिकार साप्ताहिकाला लेख धाडायला ! ते घुबड मासिकाचे संपादक आज दोन महिने माझ्या पाठीस लागले आहेत कीं कांहीं तरी लिहून द्या. परवांच मी त्यांना माझ्या मॅरेजसंबंधानं वधू पाहिजे असल्याची जाहिरात दिली. किती प्रमुख ठिकाणीं

छापली आहे त्यांनीं ती ! अन् अगदीं मोठ्या टाइपांत बरं कां ! काय म्हणतां ? चोपून पैसे घेतले असतील त्यांनीं ती छापण्या-बद्दल ? अहो ! हें काय विचारणं ? अहो ! आम्हीं लेखकांनीं या मासिकांना नुसती मजकुराचीच मदत करून कसं चालेल ? कधीं कधीं पैशाचीहि करावी लागते. बाकी माझा लेख म्हण-जेच त्यांना लाख किंमतीचा वाटतो. अन् एकादे वेळीं लेख परत आलाच तर तो आभाराशिवाय नाहींतर दिलगिरीशिवाय कधींच यायचा नाहीं. काय ? पुन्हां हंसायला लागलांत तुम्हीं ! बरं आतां या तुम्ही. मला एक नाट्यछटा लिहायची आहे. तिचं नांव काय म्हणतां ? फार विनोदी आहे तें. तिचें नांव ' साभार परत ! '



# १ बोले तैसा चाले !

‘ कसं काय रामभाऊ, काय करतों आहे म्हणून विचारतां ? ’ अहो, या आमच्या सन्स्ना जरा अॅडव्हाइस् देत होतों. अहो, जेव्हां पहावं तेव्हां आपले लेकाचे फॉरिन् टंगमध्यें बोलत असतात. काय म्हणावं यांना ? आपली सोन्यासारखी मदरटंग काय डेड् झाली, म्हणून यांनीं त्या भाषेंत सारखं बडबडावं ? अहो, मी डे अॅन्ड नाईट यांच्या कानीं कपाळीं ओरडत असतों कीं बाबांनो, तुम्हांला अक्कल नाहीं तर तुमच्या ह्या म्हाताऱ्या बापाचा तरी कित्ता गिरवा ! माझं आपलं असं आहे कीं बोले तैसा चाले ! हा माझा मॉटो आहे, काय समजलांत ? अहो, कसें झालें तरी आपलें तें आपलें ! आवर्स् इज आवर्स् ! त्याला काय परकीयांची शॉवर येणार आहे ? काय, शॉवर म्हणजे काय म्हणून विचारतां ? अहो, शॉवर म्हणजे सर, पावसाची सर नाहीं कां आपण म्हणत ? काय, तो अर्थ इथें लागू पडत नाहीं म्हणतां ? बरं बरं. हो, काय म्हणत होतों मी ? कीं माझं

वर्तन म्हणजे अगदीं बोले तैसा चाले, असं असतं. अहो, जी गोष्ट भाषेची तीच कपड्यांची. मी जसा मदरटंगचा तसाच स्वदेशीचाहि स्ट्रिक्ट् अभिमानी आहें. अहो, लोकमान्य टिळक आणि आम्ही म्हणजे काय अगदीं बरोबरीचेच. त्यांचा अन् माझा जन्म एकाच शतकांत झाला. शिवाय त्यांच्या एका व्याख्यानाचे वेळीं फार गर्दी झाली तेव्हां त्यांची माझी कड-कडून भेट झाली होती. भेट म्हणजे काय, माझा त्यांना चांगलाच धक्का लागला होता म्हणाना ! काय, तुमच्या अंगावर मँचेस्टरचे कपडे कसे म्हणून विचारतां ? बरं विचारलंत. फारच गमती-दार हकीकत आहे ती. परवां काय झालं, आमच्या ज्येष्ठ चिरं-जीवांनीं मँचेस्टरचा एक सबंध तागा घरीं आणून टाकला. मला असा राग आला आहे म्हणतां ! रागाच्या भरांत मी त्याचे फाडून तुकडे करून टाकणार होतों. पण म्हटलं, अविवेकः पर-मापदां पदम् ! रागाच्या भरांत असं अव्यवस्थित व विधुळवाटीचं काम नाहीं आपण करायचं. मला पहिल्यापासूनच व्यवस्थित-पणाची भारी आवड. अहो, मी सासवडला घर बांधलं तें सुद्धां किती नमुनेदार ! अगदीं सारं जिथल्या तिथं. खांबावर तुळई, खालीं जमीन, वर छप्पर-बरं तें जाऊं द्या. तेव्हां मी काय केलं, लगेच एका शिंप्याला बोलावून आणला, आणि तें कापड अगदीं व्यवस्थित रीतीनं, माप घेऊन, फाडून टाकायला त्याला सांगि-

तलं. आतां खरी गम्मत तर पुढेंच आहे. अहो, त्या गाढवानं माप कशाचं घेतलं म्हणाल तर माझ्याच जुन्या कपड्यांचं ! मीं ते त्याला नुसते दाखवीत होतों अन् म्हणत होतों कीं, हे बघ कसे अस्सल स्वदेशी आहेत ते, तेवढ्यांत त्या गुलामानं त्यांचं माप घेऊन त्या ताग्यांतून कपडे बेतलेन्. मग आमचे चिरंजीव म्हणूं लागले, "बाबा, एवीं तेवीं तागा तर आणला, अन् तुमच्या अंगाचे कपडे तर बेतले, आतां शिवून घ्या तुम्हांलाच कपडे झालं!" करतां काय? मुलांची हौस आपण नाहीं पुरवायची तर कोणीं? मीं म्हटलं, "बरं बाबा, आतां तूं म्हणतोच आहेस तर घेतों शिवून. पण उरलेला तागा तरी दुकानदाराला परत नेऊन दे." तो म्हणत होता कीं, "अर्धवट फाडलेला तागा कसा परत करायचा?" पण माझा करारी स्वभाव तो! मीं म्हटलं, "तें कांहीं नाहीं. विलायती कापड माझ्या घरांत उपयोगी नाहीं." अहो, आम्ही जर बोलल्याप्रमाणें वागलों नाहीं तर मुलांना वळण कसं लागणार? शेवटीं मीं त्याला उरलेलें कापड परत करायला लावलंच. असं कधीं कधीं मुलांच्या इच्छेविरुद्ध वागावं लागतं. पण करतां काय? आमचं ब्रीद पडलं ना! बाकी एरव्हीं मी त्यांची प्रत्येक हौस पुरवीत आलों आहें. परवांचंच उदाहरण घ्या ना! माझं चवथं कुटुंब जाऊन पुरे दोन महिने देखील झाले नव्हते, तों चिरंजीव

मागें लागले कीं, " बाबा, आतां मॅरेज करा." मीं म्हटलं, " अरे, आतां आधीं तुमचं लग्न करायचं कीं पुन्हां पुन्हां माझंच ?" पण तें कांहीं मुलांना पटेना. बरोबरच आहे. अहो, सावत्र झाली तरी ती आईच ना ! ती मुलांना हवीशी वाटणारच. शेवटीं मुलांच्या आग्रहास्तव चिरंजीवांनाच सांगून आलेली मुलगी तिच्या बापाला पांच हजार रुपये देऊन करून घ्यावी लागली. काय म्हणालांत ? तुम्ही तर पुनर्विवाहाच्या विरुद्ध लेक्चरं देत होतात आणि स्वतः मात्र पांचव्यांदा लग्न कसं केलंत ? अहो मिस्टर, तुम्हांला मराठी शब्दांचा अर्थ तरी कळतो कां ? मीं पुनर्विवाह नाहीं केला. चांगल्या कुमारीशीं पांचवं मॅरेज केलं समजलांत ? स्त्रियांनीं एक नवरा मेल्यावर पुन्हां लग्न केलं कीं त्याला पुनर्विवाह म्हणतात. पुरुषांनीं अनेक लग्नं केलीं तर त्याला दुसरं पांचवं, आठवं, लग्न असं म्हणतात. कळलं कां महाराज ? मी पुनर्विवाहाच्या अगेन्स्ट् होतों व अजूनहि आहेंच. माझ्या बाबतींत तुम्हांला नांव ठेवायला मुळींच जागा सांपडायची नाहीं. माझें तत्त्व म्हणजे बोले तैसा चाले. का, फजिती झाली म्हणून उठून चाललांत वाटतं ? बरं या, गुड् डे.



# ३ आमचा माल चोख ! आमच्या किंमती माफक !

या रावसाहेब ! बसा, आज फार दिवसांनीं कृपा झाली आमच्या दुकानावर ! अरे, रावसाहेबांना पानसुपारी आण बरं. काय हुकूम आहे ? काय म्हणतां ? हुकूम नाहीं, तक्रार आहे ? काय तक्रार आहे ? अहो, गिऱ्हाइकांकडून तक्रार येईल असं आम्ही कधीं करीतच नाहीं मुळीं ! आमचा माल चोख ! आमच्या किंमती माफक ! आमचीं वजनं मापं तर काय, अगदीं सरकारी शिक्क्याचीं ! काय म्हटलंत रावसाहेब ? माझं बोलणं तर ऐकूनच घेत नाहीं तुम्हीं ? वा ! रावसाहेब ! अहो, तुमचे हुकूम ऐकायला तर बसतों सकाळपासून रात्रीपर्यंत दुकानावर. अहो, आमचं गिऱ्हाईक हेच आमचे अन्नदाते ! तेच आमचे देव ! काय, तुमचं चऱ्हाट जरा बंद ठेवा म्हणतां ? बरं बुवा ! हें केलं बोलणं बंद. आतां फरमावा आपला हुकूम. अहो, आम्ही आपले ताबेदार आहों. आपला हुकूम व्हायचा अवकाश,

कीं बजावलाच तो आम्ही ! अहो, गिऱ्हाइकांची खोटी किंवा गैर-सोय होऊं नये म्हणून मुद्दाम दहा नौकर ठेवले आहेत आम्ही दुकानावर. अन् सगळे कसे अगदीं एकाहून एक हुषार अन् इमानी बरं कां ! कध्धीं फसवायचे नाहींत. काय म्हणतां ? तुम्हांला फसवायचे नाहींत, फक्त गिऱ्हाईकांनाच फसवतात ? वा ! वा ! रावसाहेब ! आपला स्वभाव फारच विनोदी बुवा ! अहो, असं कधीं झालं आहे ? अहो, जसे आम्ही तसेच आमचे नौकर ! काय म्हणतां ? मी तरी तेंच म्हणतों आहें ? अहो, आमच्या ' कोल्हे अँड सन्स 'च्या चोख व्यवहाराची ख्याति सगळ्या जगभर—कां रावसाहेब, हसतां आहांत ?—अहो, जगभर म्हणजे काय, या गांवांत, निदान या गल्लींत तरी जगजाहीर आहे. काय म्हणतां ? तें सारं खरं, पण मला केव्हां बोलूं देणार ? अहो, बोला कीं ! रावसाहेब, तुमचा शब्द म्हणजे तुमच्या पैशापेक्षांहि आम्हांला अधिक किंमतीचा वाटतो. काय, मग बिलाच्या पैशाऐवजीं शब्दच लिहून धाडीत जाईन म्हणतां ? फारच विनोदी स्वभाव आपला रावसाहेब ! आम्हांला कीं नाहीं आपल्यासारखीं आनंदी गिऱ्हा-इकं फार फार आवडतात. कधीं मालाची तक्रार नाहीं, पैशांची खोटी नाहीं, कांहीं नाहीं. काय म्हणतां ? परवांच्या तांदुळांत लाखों आळ्या होत्या ? अहो, पावसाळ्यांत आळ्या ह्या व्हाय-

च्याच ! काय म्हटलंत ? हा तर उन्हाळा आहे ? अहो, तें खरं. पण मागच्या पावसाळ्यांतल्या आळ्या आहेत त्या ! अहो, जुने तांदूळ चागले म्हणून मी आपल्याला मुद्दाम धाडले. आपल्याला, अन् वाईट माल, मनांत देखील आणूं नका अगदीं ! अहो, वाईट माल गळ्यांत बांधायचीं गिऱ्हाइकं वेगळीं ! अहो, तांदुळांत जितक्या आळ्या अधिक तितके ते अस्सल जुने आहेत म्हणून समजावं. आळ्या काढून टाकून धाडले कीं गिऱ्हाइकाला उगीच संशय येतो कीं आम्हीं नवेच तांदूळ पाठवले आहेत. काय म्हणतां ? त्या दिवशीचे नारळ सगळे गोटे निघाले ? अहो, ते नारळ आम्हीं मुद्दाम जपानहून मागवले आहेत. फारच महागाचे आहेत ते, पण आपल्याला ते नेहमींच्याच भावानं दिले आहेत बरं कां ? जपानी लोकांना कीं नाहीं, नारळांत पाणी अगदीं खपत नाहीं. म्हटलं, आपले मावस चुलत बंधू जपानला जाऊन आले आहेत, तेव्हां आपल्याला तसलेच नारळ आवडत असतील. अहो, मुद्दाम मजूर लावून निवडून काढले तसले नारळ. त्याची मजुरी देखील लावली नाहीं बरं का आपल्या बिलांत ! काय म्हणतां, फार उपकार झाले ? वा ! वा ! रावसाहेब ! अहो, त्यांत उपकार कसले ? अहो, गिऱ्हाइकांचा संतोष हेंच आमचं बक्षीस ! काय, गव्हांचा भाव बिलांत दुप्पट लावला आहे म्हणतां ? छे

हो ! असं कसं होईल ? पाहूं द्या मला बिल ? दोन रुपये पांच आण्यांचे बदलीं पांच रुपये दोन आणे लावले आहेत म्हणतां ? हो, आहेत खरे. काय हा आमचा कारकून बेफिकीर आहे पहा ! अहो, हिशेबाच्या कामांत असली घोडचूक करायची म्हणजे काय ! अहो, नेहमीं अशा चुका करतो हा ! मी आतां त्याला रजाच देणार आहें मुळीं ! अहो, एवढाले पगार द्यावे, पण दुकानांत एक नौकर कामाचा असेल तर शपथ ! सगळे एकजात चुकार अन् लुच्चे ! काय म्हणालांत ? साखर पांच शेराच्या बदली चार शेरच भरली ? असं व्हायचं नाहीं कधीं रावसाहेब ! काय म्हणतां ? घरीं चक्क वजन करून पाहिली ? अहो ! मग बरो-बरच आहे ! साखरेला मुंग्या म्हणजे कोण ! अहो ! बोलून चालून साखरच ती ! दुकानांतून घरीं नेईपर्यंत शेरभर साखर मुंग्यांनीं सहज चट्ट केली असेल ! म्हणून कमी भरली ती, दुसरं काय ? काय म्हणतां ? पावशेर बडिशोपेच्या ऐवजीं दोन शेर बाळंतशोपा काय पाठवलांत ? छे हो ! असा गाफीलपणा आमच्या दुकानांत कधींच व्हायचा नाहीं. काय म्हटलंत ? गिऱ्हाईक झालों तरी बडिशोप कोणती अन् बाळंतशोपा कोणता हें समजण्याची मला अक्कल आहे ? वा ! असं काय बोलतां आपण रावसाहेब ! काय रे रामा, काय म्हणताहेत हे



अरे गाढवा ! तूं जिनसांची अदलाबदल केलीस !

रावसाहेब ? काय म्हणतोस ? रानडे यांच्याकडे बडिशोप अन् कानड्यांच्याकडे बाळंतशोपा पाठवला ? अरे गाढवा ! तूं जिन-सांची अदलाबदल केलीस ! अरे, हे कानडेसाहेब. यांना बडि-शोप हवी होती. एका अक्षराच्या फरकामुळें एवढा घोटाळा झाला पहा रावसाहेब ! बाकी बाळंतशोपा सुद्धां असावा नेहमीं घरांत. नांवामुळें जरा घोटाळा झाला, नाहींतर आमच्या हातून असं कध्धीं व्हायचं नाहीं. अहो ! आमचा माल चोख ! आमच्या किंमती माफक ! अन् आमचीं वजनंहि—कां, राव-साहेब, एकदम उठलातसे ? घाई आहे वाटतं जायची ? या. कांहीं हुकूम असला तर कळवीत जा.



# ४ तुम्हांला येवढं समजायला पाहिजे!

काय मिस्टर धडफळे, किती वाजले पाहिलेत कां? इतक्या उशीरां शाळेंत यायचं म्हणजे काय? काय म्हणालांत? व्हिलेपार्ल्याला आपल्याच घरीं फणस पोहोंचवायला गेलों होतों? मिस्टर धडफळे, मीं तुम्हांला हजार वेळां सांगितलं आहे कीं खासगी गोष्टींचा उल्लेख शाळेंत करीत जाऊं नका. तुम्हांला येवढं समजायलाच पाहिजे! अन् माझ्या घरीं गेलांत म्हणून काय झालं? शाळेंत वेळेवर यायलाच पाहिजे. डयूटी इज् डयूटी, समजलांत? काय म्हणतां, तेथें बाईसाहेबांनीं मुलं खेळवायला थांबवून घेतलं? पुन्हां तेंच! खासगी गोष्टींचा शाळेंत उल्लेख! मिस्टर धडफळे, यू हॅव्ह् नो मॅनर्स! तुम्हांला रीतभात मुळींच नाहीं! बरं, तें जाऊं द्या. सह्यांना कागद आणा आतां लवकर. हं, हें कुणाचं पत्र? शाळेचा रिझल्ट पाठवण्याबद्दल इन्स्पेक्टरसाहेबांकडून सातवं रिमाइंडर? व्हॉट् डू यू मीन बाय् धिस् निग्लिजन्स्, मिस्टर धडफळे? या तुमच्या

निष्काळजीपणाला काय म्हणावं ! तुम्ही माझे फेव्हरिट मास्तर म्हणून तुम्हांला स्पेशल आठ आणे प्रमोशन देऊन हें कारकुनाचं काम सोंपविलं, अन् तुम्ही वेळचेवेळीं पत्रांचीं उत्तरं देखील धाडीत नाहीं ? काय म्हणतां ? आपलेच पेपर अजून तपासून झाले नाहींत म्हणून रिझल्ट धाडतां आला नाहीं ? काय हा तुमचा विसराळूपणा मिस्टर घडफळे ! अहो, माझे पेपर अजून तपासून झाले नाहींत तर मला आठवण द्यायचं तुमचं काम होतं कां नाहीं ? माझ्या मागं हजार कामं असतात, तेव्हां तुम्हांला येवढं समजायला हवं कीं मला आठवण दिली पाहिजे. काय म्हणालांत ? पुष्कळदां आठवण दिली ? अहो, अजून मीं पेपर तपासले नाहींत यावरूनच सिद्ध होत आहे कीं तुम्हीं पुरेशी आठवण दिली नाहींत. तुम्ही माझ्याशीं आर्ग्युमेंट करून निसटून जायला पहातां आहां मिस्तर घडफळे ! पण म्हटलं उगीच नाहीं, हा नांवाचा लफंगे हेडमास्तर आहे ! आमच्या लहानपणीं शाळेंत 'शिमगा' या विषयावर भाषण केल्याबद्दल पहिलं बक्षीस मिळालं होतं मला ! अन् शिमग्यांतल्या सगळ्या खेळांचा डायरेक्टर होतों मी ! म्हणूनच या मवालीपुऱ्यांतल्या शाळेचा हेडमास्तर झालों ! त्याला पाहिजे जातीचें, समजलांत मिस्टर घडफळे ! बरं तें जाऊं द्या. आतां त्या गाढवे मास्तरनाच

## ४ तुम्हांला येवढं समजायला पाहिजे!

काय मिस्टर धडफळे, किती वाजले पाहिलेत कां? इतक्या उशीरां शाळेंत यायचं म्हणजे काय? काय म्हणालांत? व्हिलेपार्ल्याला आपल्याच घरीं फणस पोहोंचवायला गेलों होतों? मिस्टर धडफळे, मीं तुम्हांला हजार वेळां सांगितलं आहे कीं खासगी गोष्टींचा उल्लेख शाळेंत करीत जाऊं नका. तुम्हांला येवढं समजायलाच पाहिजे! अन् माझ्या घरीं गेलांत म्हणून काय झालं? शाळेंत वेळेवर यायलाच पाहिजे. ड्यूटी इज् ड्यूटी, समजलांत? काय म्हणतां, तेथें बाईसाहेबांनीं मुलं खेळवायला थांबवून घेतलं? पुन्हां तेंच! खासगी गोष्टींचा शाळेंत उल्लेख! मिस्टर धडफळे, यू हॅव्ह् नो मॅनर्स! तुम्हांला रीतभात मुळींच नाहीं! बरं, तें जाऊं द्या. सह्यांना कागद आणा आतां लवकर. हं, हें कुणाचं पत्र? शाळेचा रिझल्ट पाठवण्याबद्दल इन्स्पेक्टरसाहेबांकडून सातवं रिमाइंडर? व्हॉट् डू यू मीन बाय् धिस् निग्लिजन्स्, मिस्टर धडफळे? या तुमच्या

सांगा तेवढे पेपर तपासून द्या म्हणून. अन् त्यांना नीट बजावा कीं उद्यां अकरा वाजण्याचे आंत सगळे दोनशेंच्या दोनशें पेपर तपासून झाले पाहिजेत; तरच उद्यां या सातव्या रिमाइंडरचं उत्तर पाठवतां येईल. काय म्हणतां, एका दिवसांत दोनशें पेपर कसे होतील ? काय झालं न व्हायला ? अहो, गाढवे मास्तर आहेत ना ते ? गाढवाला ओझं कधीं ज्यास्त होतं कां ? अन् शिवाय चोपून सतरा रुपये पगार खाताहेत, तेव्हां दोनशेंच काय पण चारशें देखील पेपर तपासले पाहिजेत त्यांनीं एका दिवसांत, समजलांत मिस्टर धडफळे ! तुम्हांला त्यांची कीव नको आहे यायला. बरं आतां बाकीच्या मास्तरांचे रिझल्ट आणा पाहूं इकडे ! हं, हें काय ? या नागेश सहस्रबुद्धेला गणितांत शंभरांपैकीं पंचाण्णव मार्क, अन् त्याचा पहिला नंबर ? कोणीं तपासला त्याचा पेपर ? काय, तुम्हीं स्वतःच ? तुम्हांला येवढं समजायला पाहिजे मिस्टर धडफळे, कीं प्रत्यक्ष माझा मुलगा त्या वर्गांत असतांना त्या भिकार सहस्रबुद्ध्यांच्या मुलाचा पहिला नंबर येतोच कसा ? कधीं कांहीं घरचं काम सांगितलं तर करायचा नाहीं कीं कधीं कांहीं जिन्नस घरीं पोहोंचवायचा नाहीं; अन् वर म्हणतो काय कीं हेडमास्तर नांवाप्रमाणेंच लफंगे आहेत ! अन् अशा उर्मट अन् पाजी माणसाच्या मुलाचा पहिला नंबर ? काय म्हणतां, त्याचीं

सगळीं उदाहरणं बरोबर आहेत ? नॉन् सेन्स् ! तुम्हांला काडीची देखील अक्कल नाहीं मिस्टर धडफळे ! माझ्यासारखा सज्जन अन् दयाळू हेडमास्तर आहे म्हणूनच तुमची नौकरी शाबूत आहे. अहो, नुसत्या उदाहरणांवरून कां कुठें मार्क द्यायचे असतात ? कांहीं कॉमन् सेन्स् वापराल कीं नाहीं ? मुलगा कोण, कुणाचा, हें कांहीं पहाल कीं नाहीं ? कां आपला वाचला पेपर अन् दिले मार्क, असा आंधळा कारभार चालवणार ? काय म्हणालांत, आपलीच सगळ्यांना ताकीद आहे कीं पेपर अगदीं बरोबर तपासले पाहिजेत म्हणून ? हो ! हो ! माझी आहेच तशी ताकीद ! नाहीं कोण म्हणतो ? पण त्या ताकिदीचा खरा गूढ अर्थ समजायची अक्कल पाहिजे ना तुमच्यांत ! अहो, बरोबर म्हणजे—बरोबर ! आतां तरी शिरलं कां डोसक्यांत ? बरं, आतां रिझल्ट पुढें पाहूं या. हा कोण, दगडू लाळघोटे, अन् याला शून्य मार्क ! म्हणावं तरी काय तुम्हांला मिस्टर धडफळे ! मार्क देतेवेळीं डोक्यांत दगड भरले होतेत कीं काय ? अहो, या दगडूचा बाप अन् आम्ही म्हणजे किती जिवश्च कंठश्च दोस्त ! मला घेतल्याशिवाय एक दिवस सिनेमाला जायचा नाहीं कीं कधीं कोंकणांतनं कांहीं आणलंन् तर मला दिल्याशिवाय रहायचा नाहीं. अन् त्याच्या मुलाला शून्य मार्क ! तुम्हांला येवढं समजायला पाहिजे मिस्टर धडफळे ! काय

म्हणालांत, त्याचा पेपर कोरा आहे ? मग, त्याचा पेपर कोरा असला म्हणून काय झालं ? दुसरे चांगले लिहिलेले पेपर काय ओस पडले होते ? या पेपरांतले कागद त्यांत घातले कीं झालं ! इतकीं वर्षं माझ्या हाताखालीं नौकरी करतां, अन् येवढी साधी गोष्ट सुद्धां तुम्हांला समजूं नये ? आय् पिटी यू, मिस्टर धडफळे ! मला तुमची कींव येते. तें कांहीं नाहीं. हा सगळा रिझल्ट फाडून टाका अन् दुसरा बरोबर रिझल्ट—समजलांत कां मिस्टर धडफळे ?—अगदीं बरोबर, व्यवस्थित रिझल्ट—उद्यांच्या उद्यां तयार करा. आतां दुसरे कागद आणा सह्यांना. हें बिल कसलं ? स्कूल रेस्टोरांचं चहाचं अन् केक्स्‌चं बिल, अन् तेंहि तेरा रुपये दहा आणे ? मग तें इतके दिवस कां दिलें नाहींत ? काय म्हणतां, आपण पैसे दिल्याशिवाय कोठून देऊं ? तुमच्या म्हणण्याचा अर्थ काय, मिस्टर धडफळे ? शुद्धींत आहांत कां स्कूल रेस्टोरांमध्यें दारू पिऊन आलां आहांत ? काय म्हटलंत, तें आपलं खासगी बिल आहे ? कमाल आहे तुमची मिस्टर धडफळे ! अहो, तें काय माझ्या वरच्या वाण्याचं किंवा धोब्याचं कां बिल आहे ? अहो, हें रेस्टोरांच मुळीं शाळेच्या नांवचं; मी चहा प्यायलों तोहि शाळेच्याच आवारांत, अगदीं या ऑफिसांत; अन् तोहि शाळेचं काम नीट व्हावं म्हणून. अन् इतकं असून तुम्ही म्हणतां कीं हें आपलं खासगी बिल आहे !

तुम्हांला येवढं समजायला पाहिजे होतं कीं असलीं बिलं ऑफिसच्या खर्चांतून भागवायचीं असतात. काय म्हणतां, हिशोब तपासनीस त्याला हरकत घेतील ? मग तें बिल फाडून टाकून दुसरं कसलं तरी बनवा, सांगा त्या कनिंग ब्रदर्सना कीं स्टेशनरी मालाचं एक बिल बनवून द्या म्हणून. परवांच त्यांच्या मुलाला वरच्या वर्गांत ढकलायचं कबूल केलं आहे मीं. यापुढें असल्या बारीक सारीक बाबती तुम्ही स्वतःच निकालांत काढीत जा, समजलांत मिस्टर धडफळे ! तुम्हांला मी येवढी सत्ता अन् प्रमोशन कशासाठीं दिलं आहे हें तुम्हांला समजायला पाहिजे. हें काय, ही घंटा कसली ? दीड वाजला वाटतं ? तुमच्याशीं डोकेफोड करण्यांत माझा तास घ्यायचा राहून गेला. बरं, आतां आजचं काम पुरे झालं. आतां चहाची वर्दी द्या. जा.



# ५ म्हटलं उगीच नाहीं इंद्रभुवन नांव दिलं !

कसं काय, साहेब ? ठीक आहे ना ? कशी आहे आमच्या इंद्रभुवनाची व्यवस्था ? काय म्हणतां, तें कांहीं विचारूं नका ? वा ! अहो, न विचारून कसं चालेल ? मी या लॉजचा मॅनेजर ना ? मी स्वतः रोज सगळ्या पॅसेंजरांची विचारपूस करायला प्रत्येक खोलींत हिंडत असतों. बाकी कोणाकडून कधीं तक्रार अशी मला ऐकूं येतच नाहीं म्हणा ! काय म्हणालांत, बहिरे आहांत वाटतं ? छे हो ! चांगले दोन्हीं कान लांब आहेत माझे. पण आमची व्यवस्थाच इतकी चोख असते कीं तक्रारीला मुळीं जागाच नसते आमच्या भुवनांत काय म्हणालांत, सगळं भुवन केरानं भरलं असल्यामुळं तक्रारींना जागा नाहीं त्यांत ? वा ! साहेब ! जागा ह्या शब्दावर भारी नामी कोटी केलीत आपण ! अहो, केराचं असं आहे कीं रोज इथं शेंकडों पॅसेंजर येतात अन् जातात. काय म्हणतां,

कुणीच इथं टिकत नाहीं वाटतं ?—तसं नव्हे हो ! नवे येतात अन् पुष्कळ दिवस राहिलेलें काम संपल्यामुळं जातात. जातांना धांदल झाल्यामुळं कोणाची आंगठी हरवते, कोणाचे पैसे हरवतात, अन् तें सारं हटकून केरांत सांपडतं. म्हणून आम्ही मुद्दाम सगळ्या खोल्यांतून केर सांठवतों. स्पेशल नौकर ठेवले आहेत आम्ही तेवढ्यासाठीं. अन् ज्या पॅसेंजरांना जी वस्तू सांपडेल ती त्यांनींच घ्यावी अशी स्पेशल सवलत देतों आम्ही पॅसेंजरांना. फक्त त्यांतील पाऊणशें टक्के कमिशन म्हणून आम्ही घेतों. काय म्हणतां, अगदींच चुकलों मी ! काय हो, काय झालं ? कांहीं आंगठी, घड्याळ, सांपडलं आहे वाटतं तुम्हांला ? काय म्हणतां, काल रात्रीं एक लाख ढेकूण सांपडले त्यांतले पाऊण लाख तुम्हाला द्यायला विसरलों ? अहो, जाऊं द्या. त्यांत काय बिघडलं ? अहो, ढेकणांचं असं आहे, तुम्ही इथं येण्यापूर्वीं एक जैन पॅसेंजर रहात होता या खोलींत. तो काय म्हणे, ढेकूण, डांस यांना आपलं रक्त देणं हा आमचा धर्म आहे. अहो, तो रोज पलीकडच्या त्या भिकार सूर्यनिवासांतून ढेकूण पकडून आणायचा अन् आपल्या स्वतःच्या पलंगावर ठेवायचा. काय म्हणतां, मग सूर्यनिवासांतले ढेकूण नाहींसे झाले असतील म्हणून तिथंच रहायला जावं ? छे ! छे ! मनांत दिखील आणूं नका तें ! अहो, सूर्यनिवासांतले फक्त ढेकूणच इकडे येतात, पण आम-



छे ! मनांत दिखील आणूं नका तें ! आमच्याकडे निघालेले साप विंचू आम्ही तिकडे नेऊन टाकीत असतों !

च्याकडे निघालेले साप विंचू आम्ही तिकडे नेऊन टाकीत असतों ! काय म्हटलंत, तुमच्या खोल्या इतक्या कोंदट अन् अंधाऱ्या कशा ? अहो, त्याचं असं आहे कीं, आमचं इंद्रभुवन कसं अगदीं आरशासारखं स्वच्छ आहे तें तुम्ही पहातांच आहां—म्हटलं उगीच नाहीं इंद्रभुवन नांव दिलं ! पण भोंवतालच्या चाळींतले लोक चोहोंकडे घाण टाकतात, अन् ती सगळी घाण वाऱ्याबरोबर आंत येते. म्हणून परवां ते डॉक्टर काळोखे आले होते भुवनांत—आमचे नेहमीचे पॅसेंजर आहेत ते. काय म्हणतां, तुमचा त्यांचा जोड धंदा आहे वाटतं ? छे हो ! जोड धंदा-बिंदा कांहीं नाहीं, पण आमच्या पॅसेंजरांना फुकट तपासतात ते. अहो, रोज शेंकडों पॅसेंजरांना फुकट तपासतात ते. किती मोठी सवलत देतों आहों आम्ही पॅसेंजरांना ! हो, काय सांगत होतों मी ? डॉक्टर काळोखे म्हणाले कीं तुम्ही इंद्रभुवनाच्या साऱ्या दारं खिडक्या नेहमीं बंदच ठेवीत जा, म्हणजे बाहेरची घाण आंत यायची नाहीं. आम्ही विचार केला कीं, पॅसेंजर नेहमीं खिडक्या उघड्या टाकणार अन् आंत घाण येणार. म्हणून आम्ही मुद्दाम गवंडी लावून खिडक्या बुजवून घेतल्या. म्हणून तुम्हांला त्या कोंदट वाटतात. नाहींतर पहिल्यांदा इंद्र-भुवन फार हवाशीर होतं. अहो, या कोंदटपणाबद्दल स्पेशल भाडं भरावं लागतं आम्हांला ! काय, तुमचं तत्त्वज्ञान अजब आहे

म्हणतां ? कसचं कसचं ! रोज थोडी गीता वाचतों ना, म्हणून तत्त्वज्ञान समजूं लागलं आहे मला. शिवाय ते प्रोफेसर शून्यबुद्धे म्हणजे आमचे नेहमीचे पॅसेंजर. त्यांच्या सहवासानं थोडं बोला-यलाहि शिकलों आहें मी. दर रविवारीं फुकट प्रवचन असतं माझं भुवनांत. अगदीं खास सवलत आहें ही आमच्या पॅसेंजरांना. काय म्हणतां ? सकाळच्या चहांत दूधहि नव्हतं अन् साखरहि नव्हती ? अहो साहेब ! तो कांहीं इतर हॉटेलांतल्या सारखा गावठी चहा नव्हता म्हटलं ! स्पेशल चिनी चहा होता तो. परवां तें पंडित जवाहरलालांचं शुश्रूषापथक गेलं ना चीनला ? वाटेंत आमच्या भुवनांतच मुक्काम होता त्यांचा. चीनला गेल्यावर त्यांनीं हा स्पेशल चिनी चहा धाडला आम्हांला. त्यांत दूध किंवा साखर कांहींच घालायचं नसतं. अन् चवीला म्हणाल तर कांहीं विचारूं नका. अन् चहाबरोबर पत्रहि लिहिलं आहे त्यांनीं मला आभाराचं. ‘ आपल्या इंद्रभुवनाची आठवण आम्ही जन्मभर विसरणार नाहीं ’ असं लिहिलं आहे त्यांनीं. आणखी पुढं काय लिहिलं आहे त्यांनीं माहित आहे का ? ‘ आम्हांला तुमचं इंद्रभुवन म्हणजे खुद्द इंद्राचं भुवन जरी नाहीं तरी इंद्रलोकीं जाण्याचा अगदीं सोपा टप्पा आहे तो असं वाटलं. ’ अहो, प्रवचन चालतं ना माझं इथं. अशा पवित्र ठिकाणीं राहिलं कीं मोक्ष मिळायचा हें ठरलेलंच. म्हणूनच

त्यांनीं लिहिलं असेल तसं. काय म्हणतां ? इथल्या भिकार जेवणानंच कपाळमोक्ष होतो ! वा ! असं कसं म्हणतां साहेब ! अहो, प्रत्यक्ष माझी देखरेख असते ना स्वयंपाकावर ? काय म्हणालांत, सकाळीं वांग्याच्या भाजींत डेखं होतीं ! अहो, परवांच मी कुठल्याशा पुस्तकांत वाचलं—कोणतं बरं पुस्तक तें ? हां, ' ए गाइड टु हॉटेल ओनर्स, ' या पुस्तकांत वाचलं कीं वांग्यांतील खरं सत्त्व कां व्हिटॅमिन काय म्हणतात तें त्याच्या डेखांतच असतं. लगेच मी निश्चय केला कीं, आपल्या पॅसेंजरांना—तेवढयाच दरांत बरं कां—चांगलं पौष्टिक अन्न द्यायचं. अहो, चांगले चोपून पैसे घ्यायचे, मग दगलबाजी काय म्हणून ? काय, मी तरी तेंच विचारतों म्हणतां ? अहो, विचारूंच नका. दगा व्हायचाच नाहीं आमच्या भुवनांत. काय म्हणतां, दुधांत चोथा कसला लागत होता ? वा ! साहेब ! येवढं सुद्धां ओळखलं नाहीं वाटतं ? अहो, ती शिक्रण होती. आज रविवार ना ? दर रविवारीं फीस्ट असते आमच्याकडे. अहो, दूध अन् केळीं अगदीं एकजीव करायला सांगतों मी आचाऱ्यांना. म्हणून कदाचित् तुम्हांला तो चोथा आहे असं वाटलं असेल. या रविवारीं दूध अन् केळीं झालीं ना ? आतां पुढच्या रविवारीं केळीं अन् दूध देणार आम्ही. अहो, पॅसेंजरांना नित्य नवं पाहिजेना ? काय, आंघोळ व्हायची आहे

म्हणतां अजून ? कां हो ? जेवल्यानंतरसे आंघोळ करतां आहां ? प्रकृति नीट नाहीं वाटतं ? डॉक्टर काळोख्यांना बोलावूं कां ? फुकट तपासतील ते. काय म्हणतां, पाणी कोंबट असल्यामुळं सकाळीं घेववत नाहीं ? अहो, या मुंबईत उकाडा म्हणजे कोण ! पॅसेंजरांना गरम पाणी अगदीं खपत नाहीं, म्हणून आम्हीं मुद्दाम पाणी कोंबट करण्याचे बंब आणले आहेत विलायतेहून. अन् कोंबट पाण्याचा चार्जही वेगळा नाहीं बरं कां ! गरम पाण्याइतकाच. अरे रामा, साहेबांना आंघोळीला स्पेशल बंबां-तलं कोंबट पाणी काढ बरं.



## ६ असले चाळे मला नाहीं खपायचे !

ऐकलंत का सूनबाई ? हे असले चाळे मला नाहीं खपायचे ! तुम्हांला असलीं थेरं थेरं करायचीं असलीं तर माहेरचा रस्ता धरा. अहो, कांहीं तरी त्या वर्तनाला अन् नटण्या मुरडण्याला सीमा आहे का ? तो वांकडा भांग काय अन् तो लांब शेपटा काय ! असं वाटतं कीं तो शेपटा धरून खांबाला बांधून ठेवावा ! अन् तें कुंकू पहायला तर मोठी थोरली दुर्बीणच आणायला हवी ! अन् समजलांत कां सूनबाई ! पोलक्याच्या बाह्या जरा दंडावर आल्या तर कांहीं इतकं बिघडायचं नाहीं ! अगदीं आढ्यापासूनच कापायला नकोत कांहीं ! अन् गळा पण जरा लहान असला तरी कांहीं येवढी अब्रू नाहीं जायची तुमची ! म्हटलं, आम्ही पण एका काळीं तरुण होतों, पण असले चाळे आमच्या स्वप्नांतहि आले नाहींत कधीं ! बाकी आमच्या तिकडच्यांची शिस्तहि तशीच होती म्हणा ! अहो ! अलीकडचे हे नवरे म्हणजे काय, अगदीं शुद्ध सांबापुढचे ! त्यांनाच हें सारं आवडतं, मग आम्ही



हें काय ! तुझं मंगळसूत्र वाढवलं आहे वाटतं !

म्हाताऱ्या खोडांनीं नुसतं बडबडून काय होणार ? अलीकडे तें गोल नेसायचं खूळ निघालं आहे ना ? अहो ! चांगलं आपलं सोळा हातीं नेसणं सोडून तुम्हांला हीं भिकार लक्षणं कुठून आठवतात ? मिळताहेत ना लुगडीं, म्हणून ही अवदसा आठवते ! अन् पायांत काय म्हणाल तर त्या दीड रुपडीच्या चपला ! तें कांहीं नाहीं ! मी बाळूला चक्क सांगणार आहें कीं तुझ्या ह्या चवचाल बायकोला चांगली ताळ्यावर तरी आण, नाहींतर दुसरं लग्न तरी—अग बाई ! कोण, लिलू कां ? अगदीं एकाएकीं न कळवतां कशी आलीस ? अन् जावईबुवा दिखील दिसताहेत बरोबर ! काय म्हणतेस, रात्रीं गंधर्वाचं नाटक आहे, तें पहायला मुद्दाम आलांत मुंबईहून ? याला म्हणावं हौस ! कसा पण लक्ष्मीनारायणाचा जोडा शोभतो आहे ! बरं, लिलू, आधीं हा तुझा अवतार बदल आतां. नाटकाला कांहीं आतां फारसा अवकाश नाहीं. काय, आधीं मुंबईहून काय काय आणलं आहे तें पहा म्हणतेस ? बरं, उघड ती बॅग. हें काय आणलं आहेस नवीनच ? काय ? युरोपियन बायकांसारखा फ्रॉक ? अन् हा कां घालून जाणार तूं नाटकाला ? भारीच मौज दिसेल त्याची ! तुझे यजमान साहेब आहेतच, अन् आमची लिलूहि आतां मड्डम होणार ! शोभली पाहिजेना त्यांना ! फोटो तरी काढून धाडा तुमचा दोघांचा ! मी

आपल्या देवघरांत लावीन. अन् हा डबा ग कसला ? काय ? उंच टाचेचे बूट आहेत ते ? हो, झगा घातला म्हणजे ते पाहिजेतच. पण संभाळ हो ! पाय बिय घसरेल कुठं तरी. काय म्हणतेस ? रस्त्यानं मुळीं ते माझा हात सोडीतच नाहींत ? आहेतच तसे प्रेमळ आमचे जावईबुवा ! अग, पण आल्या-पासून मी पहातें आहें, आजीबाईसारखा तो डोक्यावर पदर कशाला ? काय म्हटलंस, केस परवांच बॉब केले त्याची लाज वाटते ? अग, लाज कसली त्यांत ? चालायचंच तें ! हल्लीचा काळच मुळीं तसा आहे, अन् त्यांतून तुझ्या यजमानांनाहि तें आवडतं. मग त्यांत एवढं लाजायला अन् भ्यायला काय झालं ? अग ! तुम्ही तरण्याताठ्या मुलींनीं जर नव्या नव्या फयाशनी करायच्या नाहींत तर कोणी आम्ही म्हाताऱ्यांनीं कां करायच्या ? तुमचे दिवस आहेत हे ! अगबाई ! हें काय ? तुझं मंगळसूत्र वाढवलं आहे वाटतं ? काय म्हटलंस ? मंगळसूत्र अन् बांगडया हें सर्व हंबग, प्रिमिटिव्ह रिवाज आहेत ? मरा-ठींत बोल बाई ! मला तें तुझं इंग्रजी नाहीं समजत. तूं आपल्या नवऱ्याबरोबर करीत जा इंग्रजींत गुलगुल गोष्टी. काय, मंगळसूत्र म्हणजे जंगलीपणाचं लक्षण आहे म्हणतेस ? बरं बाई ! आम्ही आपल्या जंगली ! तुम्ही आजकालच्या मुली काय काय बोलाल तेवढं थोडंच आहे. ते नाहींत इथं ऐकायला, नाहींतर म्हणाले

असते कीं आधीं दृष्ट काढ मुलीची. अन् प्रवासांत कुंकू पुसलेलं दिसतं आहे ! काय म्हणतेस ? तूं अगदींच मूर्ख आहेस ! झग्यावर कुंकूं कसं शोभेल ? हो बाई ! खरंच तें ! मला कीं नाहीं, आतां म्हातारपणामुळं एवढं तारतम्य राहात नाहीं. राग नाहीं ना आला माझ्या बाईला ? जेवायचं नाहीं म्हणतेस ? कां ग ? नेपियर हॉटेलांत ऑम्लेट चापलं आहे ? भारीच बाई तुझी काळजी हो यजमानांना ! घरीं येईपर्यंत दिखील तुला भूक निघायची नाहीं म्हणून त्यांनीं हॉटेलांत नेलं ना तुला ! काय, नाटकांची वेळ झाली ? भावजयीला नेऊं का बरोबर म्हणतेस ? नको ग बाई ! तिला स्वयंपाकाला नको का लागायला ? तुम्ही नाटकाहून परत आल्यावर तरी खास भूक लागणार तुम्हांला. बरं, निघालांत ? संभाळून जा हो ! काय बाई तरी ! म्हणे सूनबाईला नाटकाला नेऊं कां ! नाटकं पाहून पाहून तिला काय नाटककंपनींत कामं करायचीं आहेत वाटतं ? असले चाळे मला नाहीं खपायचे !



# ७ अहो ! तुमची गोष्ट अगदींच निराळी !

या, या, जनूभाऊ ! कां येणं झालं ? काय म्हणतां, थोडं काम आहे ? अहो, थोडसंच काय पण हवं तेवढं काम असलं तरी खुशाल सांगा. त्यांत येवढा संकोच कसला ? काय म्हणतां, दहा रुपये हवे आहेत ? वा ! जनूभाऊ ! माझी गरिबाची थट्टा करतां वाटतं ? अहो, तुम्ही एवढे घरंदाज अन् माझ्याजवळ पैसे मागतां ? थट्टा पुरे आतां. खरं काय काम आहे तें सांगा. काय म्हणतां, घराला पांच रुपये देखील भाडं येत नाहीं अन् तें दुरुस्त करायला दहा रुपये हवेत ? अहो, तुम्हांला दहाच काय पण शंभर रुपये हवे असले तरी कुणीहि देईल. त्यांत काय आहे मोठंसं ? अन् तुम्ही काय परके का आहां ? अहो, आपण लंगोटीमित्रांनीं जर एकमेकांना मदत करायची नाहीं तर करायची तरी कुणी ? काय म्हणतां, आतां तुम्ही मोठ्या हुद्यावर चढलां म्हणून कदाचित् ओळख विसरलां

असाल ? वा ! वा ! जनूभाऊ ! हें काय बरं बोलणं ? अहो, एकदां ज्याला आपला म्हटला तो आपला ! अन् मोठा हुद्दा कसला अन् काय कसलं ? देवाच्या दयेनं अन् तुमच्यासारख्यांच्या आशीर्वादानं मिळाली झालं रावसाहेबी ! बाकी तो गव्हर्नर फारच पाठीस लागला म्हणूनच मीं ती पत्करली. नाहीं तर मला हो काय पर्वा आहे त्या पदवीची ? काय म्हणालांत ? तें एक भूषण आहे ? हो ! भूषण तर खरंच ! अन् आमच्यासारख्यांनीं तें भूषण नाकारलं तर बिचारं सरकार तें देईल तरी कुणाला ? पण त्या पदवीप्रमाणं सारा सरंजाम ठेवावा लागतो ना ? उगीचच्या उगीच व्याप वाढतो. काय म्हणतां ? माझं काम तेवढं—हो हो ! तुम्हांला रुपये द्यायचे ना ? आहे माझ्या लक्षांत. माझा स्वभाव कीं नाहीं जनुभाऊ, फारच उदार—आतां आपलंच वर्णन आपण करायला जरा हें वाटतं, पण वेळच आली म्हणून सांगतों. माझा स्वभाव फारच उदार, पण तितकाच विसराळू ! आधीं पैसे द्यायची आठवण होत नाहीं, अन् दिले तर ते परत मागायची आठवण राहात नाहीं. काय, मी होऊन आठवणीनं परत देईन म्हणतां ? तुमची गोष्टच निराळी हो ! तुम्ही कसे विसराल ? पण आपली गोष्ट सांगतों. परवां काय झालं, त्या त्रिंबकरावांनीं असेच आमच्या घरांत तिच्याकडून आठ आणे मागून नेले, अन् झालं !

मी सतरा वेळां आठवण केली, पण ते दरवेळेला पाठवतों म्हण-
तात अन् विसरतात. आतां मी मुळीं त्यांच्या वरिष्ठालाच लिहि-
णार आहे. काय म्हणतां ? मी अगदीं नक्की पहिल्या तारखेला
देतों ? अहो ! तुमची गोष्ट अगदींच निराळी ! बाकी जगांत
असे एकेक अनुभव येतात म्हणतां, कीं कांहीं विचारूं नये !
अहो ! अगदीं मित्र मित्र म्हणवणारे देखील केसानं गळा
कापतात ! असेच परवां ते रामभाऊ, गृहस्थ म्हणतो काय
कीं फक्त आठ दिवसाकरतां पंचवीस रुपये पाहिजेत. दिले
त्याला रुपये, अन् कसलं काय अन् कसलं काय ? आठाचे नऊ
दिवस झाले तरी गृहस्थाचा पत्ता नाहीं ! काय म्हणे बायको
फार आजारी पडल्यामुळं जबलपूरला निघून गेला. तिकडे ती
बायको दगावली, अन् गृहस्थ चांगला दहाव्या दिवशीं परत
आला. इकडे मी नवव्या दिवशीं त्याची पन्नास रुपयांची आंगठी
गहाण ठेवली होती ती विकून टाकली. केवढ्याला म्हणतां ? अहो,
बांधली अशीच एका अडाण्याच्या गळयांत पाऊणशें रुपयाला !
म्हटलं त्याला डोकं लागतं डोकं ! तुमच्यासारख्याला नाहीं
साधायचं तें ! हो, काय सांगत होतों मी ? तो रामभाऊ आपण
उशीर करूनच्या करून मला म्हणतो काय कीं येवढी माझी
बायको वारली अन् तुम्हांला दोन दिवस देखील दम निघाला
नाहीं. आहे कीं नाहीं उलटा न्याय ? पैसे उसने दिले त्याचे

हे उपकार! कोणाला मदत करायला जावं तर तें असं आपल्याच गळ्याशीं येतं पहा! काय, माझ्याजवळ गहाण ठेवायला कांहीं नाहीं म्हणतां? अहो, सांगितलं ना, कीं तुमची गोष्ट अगदींच निराळी म्हणून? तुमच्याजवळ कुठें मी काय गहाण मागतों आहे? पण आपली एकेकाची रीत सांगितली. अहो! हा व्यवहार आहे. यांत फार जपून वागावं लागतं. कोण केव्हां हातावर तुरी देईल याचा नेम नसतो. त्या दिवशीं तो ऑफिसचा कारकून असाच दोन रुपये मागत होता. काय म्हणे पगाराला अजून सहा दिवस आहेत अन् घरांत आजला तांदूळ नाहींत! मी रुपये दिले नाहींत म्हणून बरं झालं, कारण दोनच दिवसांनीं त्याची बदली झाली. मग कुठं जा त्याच्या मागें वसुलीला? काय, मी इथलाच राहाणारा आहें म्हणतां? अहो! तुमची गोष्टच मुळीं निराळी! तुम्ही थोडेच कुठं पळून जाणार आहांत? पण आपलं उदाहरण सांगितलं. अहो, गांवालाच कशाला जायला हवं? कुणी आजारी पडतं, कांहीं होतं, अन् मग पडते पंचाईत पैसे परत मागायची. त्या कर्न्यांना असेच परवां दहा रुपये देणार होतों, पण देवानंच सद्बुद्धि दिली, नाहींतर त्यांच्याच बरोबर आमचे दहा रुपयेहि कायमचेच स्वर्गांत—कां उठलांतसे? घाई आहे वाटतं घरीं जाण्याची? मलाहि बाजारांत जायचं आहे. अरे रामा, माझे कपडे आण बरं.

———

# ८ म्हटलं थोडा चहा घेऊन गेलां असतात म्हणजे....

ओहो ! यावं यावं निर्मलाबाई ! फार दिवसांनीं वाट चुकलांत ! बसा. कसं काय ? ठीक आहे ना ? बसा, थोडा चहा घेऊन जा. काय, आत्तांच घरीं घेऊन आलें आहे म्हणतां ? अहो, घरीं चहा घेतल्याशिवाय का कोणी बाहेर पडतं ? घरीं घेतला असलांत तरी आमच्या घरीं थोडा घेतलाच पाहिजे. पण एकसारखा लागोपाठ चहा घेणंहि वाईटच म्हणा ! बोलून चालून पाणीच तें ! किती पोटांत ढोसायचं तरी ! पण निदान अर्धा पेला तरी घेतलाच पाहिजे. काय म्हणतां ? संध्याकाळीं चहा घेतला कीं झोंप येत नाहीं ? छे, छे ! तें कांहीं चालायचं नाहीं ! अन् अजून कांहीं तितकी संध्याकाळ झाली नाहीं. बाकी कोणाकोणाला संध्याकाळचा चहा सोसत नाहीं हें खरं हो. मलाच पहा ना, त्या दिवशीं ठमाबाईच्या इथं कुठं दोन घोट चहा घेतला; मीं कित्ती कित्ती ' नाहीं ' म्हटलं, पण माझ्या-

सारखंच त्यांनाहि अगत्य फार. नाहीं ऐकलं त्यांनीं, अन् घेतला दोन घोट–अगदीं दोनच घोट बरं कां—अन् काय विचारतां! सारी रात्र डोळ्याला डोळा नाहीं! अन् ढेकूण म्हणजे काय विचारूं नका. काय? ढेकणांमुळेंच जागरण झालं असेल म्हणतां? छे हो, तितके कांहीं ढेकूण अगदीं फार नाहींत. चहामुळंच जागरण झालं मला. पण तुमची प्रकृति कांहीं माझ्यासारखी नाजूक नाहीं. तुम्हांला सोसेल दोन घोट चहा. काय म्हणतां? फार चहा घेऊं नये म्हणून डॉक्टरांनीं सांगितलं आहे? अहो, हे डॉक्टरच मेले रोज शेंपन्नास पेले चहा ढोसतात. लोका सांगे ब्रह्मज्ञान, अन् दुसरं काय? पण चहानं प्रकृति बिघडते हें कांहीं खोटं नाहीं. परवांच ते डॉक्टर पोकळडोके आमच्या बबीच्या शाळेंत व्याख्यान द्यायला आले होते. त्यांनीं म्हणे असं सांगितलं, कीं अमक्या तमक्या बाईला फार चहा पिऊन क्षय लागला! बाकी तें तुम्हांला लागू नाहीं म्हणा! तुमच्या सारखीला काय होणार आहे धाड येवढयाशा चहानं! काय म्हणालांत? तुम्हांला फारसा वेळ नाहीं? सहा वाजतां क्लबांत जायचं आहे? हं, समजलें. तिथला इंग्लिश फॅशनचा चहा घ्यायचा असेल. बरोबर आहे! तो सोडून आमच्या गांवढ-ळांच्या येथला चहा तुम्हांला कुठला आवडायला! त्यांतून आमचं दूध म्हणजे काय! चांगलं महागाचं घेतें; अहो, आठ

शेर भावाचं, आहांत कुठं ? गांवांत कुण्णी सुद्धां इतका भाव देत नसेल; पण दूध म्हणजे निव्वळ पाणी ! अन् तेंहि आज मांजर पिऊन गेलं आहे. आणीन थोडं उमाबाईकडून मागून, पण तुम्हांला चहा घेतल्याशिवाय कांहीं जाऊं द्यायची नाहीं. काय म्हणतां ? करायचा असला तर लवकर तरी करा ? अहो, लवकर म्हणजे काय ? आत्तां होईल अर्ध्या पाऊण तासांत. कपभर चहाला किती उशीर लागणार ? माझा स्वभाव किनई फारच बडबड्या ! परवां त्या काशीताईच्या घरीं पांच मिनिटं म्हणून गेलें अन् जी बोलत बसलें, ती घरीं चिंगीला पाळण्यांत निजवून गेलें होतें तें अजिबात विसरलें. अन् इकडे तिनं उठून पाळण्यांतून उडी मारुन कपाळाला खोक पाडून घेतली. अन् पाळण्याच्याच खालीं बंड्या व गुंड्या निजले होते त्यांच्या अंगावर ती पडल्यामुळें तिघांनींहि रडून आकांत मांडला ! अन् मग मला हे असे रागावले म्हणतां ! बरं पण तुम्हांला घाई आहे नाहीं का ? आत्तां स्टो पेटवतें; पण त्यांत तेल कशाला असतंय् ! माझा स्वभाव किनई फारच विसरभोळा. परवां असं झालं—अहो, घड्याळाकडे काय बघतां एकसारख्या ? आत्तां घालते तेल अन् पेटवते स्टो. पण आतां पिन सांपडायची नाहीं. हा स्टो म्हणजे नुसतं भूत असतं भूत ! पेटला तर चटकन् पेटतो नाहींतर दोन दोन तास पेटत नाहीं. परवां

त्या इंदिराकाकूंच्या घरीं गेलें अन् असाच त्यांचा स्टो कांहीं केल्या पेटेना ! अन् आज तुम्हांला घाई आहे तशीच मला त्या दिवशीं होती. मग काय ? त्यांना ' व्हेरी सॉरी ' म्हटलं अन् निघून गेलें झालं ! अहो, घाईच्या वेळेला जर कोणी चऱ्हाट वळीत बसलं तर त्याची भीडमुर्वत किती ठेवायची ! हो, काय म्हणत होतें मी, माझा स्टो कांहीं इतका वाईट नाहीं. आतां पेटेल. काय, नोकरांना तरी सांगा म्हणतां चहा करायला ? हो, तेंहि खरंच. तुमच्या कृपेनं पुष्कळ आहेत घरांत. अरे रामा, भिकू, लक्ष्मण ! कोणीच कसे ओ देत नाहींत ? गेले असतील कुठंतरी बाहेरच्या कामाला. अस्सं होतं पहा नेहमीं. खंडीभर नोकर पण वेळेला एक हजर असेल तर शपथ ! मीच उठतें आतां. काय ? कशाला तसदी घेऊं म्हणतां ? अहो, त्यांत कसली तसदी ? तुमच्यासारखी बडी मंडळी कधीं येणार आहेत आमच्या घरीं ? बाकी आमच्या घरीं येणाऱ्या जाणाऱ्यांचा धुमाकूळ म्हणजे कांहीं विचारूं नका ! सगळ्यांचं चहापाणी करतां करतां नाकीं नव येतात अगदीं ! पण तुमची गोष्ट अगदींच वेगळी ! तुम्हांला चहा दिलाच पाहिजे. उठतेंच आतां मी. अयाई ! काय ही कळ येते उठतांना ! वातानं शरीर कसं अगदीं कुचकामाचं झालं आहे आतांशा. तरीपण आतां उठतेंच. हें काय, हे ठोके कितीचे




ॲपॉइंटमेंट म्हणजे ॲपॉइंटमेंट ! ती चुकता कामा नये !

म्हणतां ? अहो, सहा वाजले. बोलतां बोलतां वेळ केव्हां निघून जातो समजत देखील नाहीं. परवां असं झालं–काय ? व्हेरी सॉरी म्हणतां ? सहालाच ॲपॉइंटमेंट आहे ? मग काय नाइलाज आहे. ॲपॉइंटमेंट म्हणजे ॲपॉइंटमेंट ! ती चुकतां कामा नये. पण म्हटलं, थोडा चहा घेऊन गेला असतात म्हणजे–बरं बरं, या हो, नमस्कार !



# १ तुम्हीच सांगा, वेळ कुठला आणूं ?

काय म्हणतां, परवांपासून पन्नासदां सांगितलं कीं माझ्या कपड्यांच्या तेवढ्या घड्या घालून ठेव म्हणून? हो हो! सांगाल तर काय झालं! तुम्ही पन्नासदां सोडून शंभरदां सांगाल. तुम्हांला नुसतं सांगायला काय होतं? सांगणं सोपं, पण हातानं करणं किती कठीण तें जावं त्याच्या वंशा तेव्हां कळे! अहो, मी रिकामी का बसतें आहे? उठल्यापासून निजेपर्यंत एक क्षणाची फुरसत मिळेल मला तर शपथ! आजचंच पहाना? सकाळीं उठून तोंड धुवीपर्यंतच साडेआठ झाले. काय, जरा लवकर उठायला काय झालं म्हणतां? अहो, पहाटे थंडी म्हणजे कोण पडते! आधींच माझी प्रकृति ही अशी, अन् त्यांत पहांटे उठून थंडीवारा लागला म्हणजे तुम्हांलाच डॉक्टरकडे धावावं लागेल. बरं, उठून कुठं जरा चहा पोटांत जातो आहे तोंच शेजारची कुसुम आली धावत अन् म्हणाली, आज हरताळकेचा स्पेशल प्रोग्रॅम आहे रेडिओंत, अन् तुम्हांला आत्तांच्या आत्तां बोलावलं

आहे. बिचारी पोर ! येवढया हौसेनं अन् प्रेमानं बोलवायला आली, मग नको का जायला ? झालं, रेडिओ ऐकून जरा गप्पासप्पा मारतें आहे तों साडेअकरांचा ठोका पडला. घरीं येतें तों तुम्ही ऑफिसांतहि निघून गेलां होतात. जेवायला माझी वाट दिखील पाहिली नाहींत. काय म्हणतां, ऑफिसला उशीर होऊं लागला ? अहो, मला जेवायला उशीर होईल याचं तुम्हांला कांहीं नाहीं, अन् ऑफिसची तेवढी काळजी ! आम्ही बायका म्हणजे काय, कचऱ्यासमान ! बाकी मी काकूंच्या घरीं यथेच्छ फराळ करून आले होतें म्हणा ! अहो, जेवायच्या वेळीं गेल्यावर कुणी तसंच का येऊं देतं ? मग घरीं मीं एकटीनंच कसेबसे चार घास खाल्ले. अहो, त्या जेवणांत कांहीं राम तरी होता का ? मेला आचारी म्हणतो काय, कीं साहेबांच्या ऑफिसच्या वेळेला दहा वाजतां स्वयंपाक होऊन पडला आहे, अन् आतां तो निवल्यामुळें वाईट लागतो आहे ! काय बाई तरी ! अहो, या आचाऱ्यांना काय उद्योग आहे ? उठले कीं मेले स्वयंपाक करून ठेवतात. पण आम्हांला वेळ हवा ना जेवायला ! काय म्हणतां, जेवल्यावर काय केलंस ? आहे कीं नाहीं जुलूम ! अहो, येवढी सकाळपासून धावपळ केली ती जेवल्यावर मेली दोनचार तास तरी विश्रांति हवी का नको माणसाला ! तुम्हांला काय, ऑफिसच्या कामांत विश्रांतीची कशाला आठवण होते आहे !

जेवून खाऊन जरा कुठं आडवी होते आहे अन् डोळा लागतो आहे तों आला मेला आचारी पुन्हां छळायला ! म्हणे बाईसाहेब, चार वाजले, चहा निवून चालला. याचं आपलं जेव्हां पहावं तेव्हां जेवण निवलं, चहा निवला, आहेच ! अहो, मी इतकी गरीब म्हणून असले नौकर वागवून घेत आहें ! करतां काय ? आपल्याला वेळ नाहीं, मग नौकर करतील तसं चालवून घ्यावं लागतं. काय म्हणतां, निजून उठल्यावर तरी तेवढं काम—अहो, माझं पुरतं ऐकून तरी घ्याल कीं नाहीं ? तुम्हांला कीं नाही जरासुद्धां दम नाहीं. मी चहा घेतें इतक्यांत देशपांड्यांच्या उमाबाई, सोहोन्यांच्या रमाबाई, ओकांच्या ठमाबाई अन् रानड्यांच्या श्यामाबाई येऊन हजर ! मग पुन्हां त्यांचा चहा झाला, खाणं झालं, त्यांत दोन तास गेले. मग त्यांनीं काढला पत्त्यांचा डाव. करतां काय ? आपल्या घरीं चार मंडळी आली कीं त्यांच्या कलानं घ्यावं लागतं. अहो, आपण जर त्यांच्याशीं तुसडेपणानें वागलों तर येईल कोण आपल्या घरीं काळं कुत्रं ! काय म्हणतां ? खेळतां खेळतां देखील एकीकडे येवढंसं काम झालं असतं ? अहाहाहा ! कांहीं तरी समजतं का तुम्हांला ? एकीकडे काम करतां करतां खेळलं अन् डाव हरला म्हणजे सगळ्या म्हणतील, ठोमऱ्यांच्या बायकोला पत्तेसुद्धां खेळतां येत नाहींत ! तुमचीच नाचक्की होईल त्यांत ! अन् तुम्हांला कुणी ऑफिसचं काम



हेंच तें ! तुम्हांला व्यवहारज्ञान नाहीं म्हणते तें हेंच !

करतां करतां पत्ते खेळायला सांगितलं तर येतील का खेळतां? बरं, त्या बायका पुरत्या घराच्या बाहेर पडताहेत न पडताहेत तोंच ती घैसासांची बची उभीच माझ्या पुढं! म्हणते काय, कीं आई, बाबा, सगळीं चार्ली चाप्लिन पहायला जाताहेत अन् त्यांनीं तुम्हांला अगदीं अगत्यानं बोलावलं आहे. आलं का पुन्हां विघ्न? तशीच घाईघाईनं कपडे बदलून टॉयलेट करून बाहेर पडलें ती आतां साडेनवाला घरीं येते आहे. अजून जेवण दिखील झालं नाहीं माझं. तुम्ही जेवून घेतलं असेलच, हो ना? माहीतच तें मला? माझी तुम्ही वाट पहाल इतकं माझं नशीब थोर कुठं आहे! थिएटरांत चहा अन् फराळ केला आहे म्हणून दम तरी निघाला मला येवढा वेळ. आतां तुम्हीच सांगा, काम दिसण्यांत येवढंस, पण तेवढं करायला तरी वेळ कुठला आणूं? काय म्हणतां? सिनेमा पहाण्यावांचून काय अडलं होतं? हेंच तें! तुम्हांला व्यवहारज्ञान नाहीं म्हणते तें हेंच! अहो, दुसरी मंडळी जर आपल्याला फुकट सिनेमा पहायला नेताहेत तर त्यांना नाहीं कां म्हणायचं? अहो, तेवढेच आपले पैसे नाहीं का मी वाचवीत? काय म्हणतात ना, ज्याचं करावं बरं, तें म्हणतं—कोण तें? विमल! काय म्हणतेस? लक्ष्मीबागेंत हिराबाईचं गाणं आहे? अजून माझं जेवण व्हायचं आहे ग. काय, लवकर जेऊन या म्हणतेस? आलेंच हं. आतां ही येतेंच.

---

# १० मी होतों म्हणून दंडावर निभावलं !

काय म्हणतां मिस्टर लांडगे ? दाव्याचा निकाल माझ्या-विरुद्ध कसा झाला ? अहो, तुम्हांला फक्त पांचशें रुपये दंडच काय तो झाला ना ? नशिबवान् खरे बुवा तुम्ही ! काय म्हट-लंत, तुम्ही तर म्हणत होतात कीं तुम्हीच केस जिंकणार अन् फिर्यादीचा खर्चहि तुम्हांला मिळणार म्हणून ? अहो, तें सारं खरं मिस्टर लांडगे ! मी तसं म्हणत होतों, अन् अजून देखील म्हणतों आहे कीं वरच्या कोर्टांत तुम्ही केस जिंकणार, तुम्हांला फिर्यादीचा खर्च मिळणार, अन् आम्हांला बक्षिसहि–काय म्हणता ? खालच्या कोर्टांत काय दिवे लावलेत ? अहो राजेश्री ! मी होतों म्हणूनच दंडावर निभावलं, नाहींतर आणखी काय काय गदा आली असती तुमच्यावर कुणास ठाऊक ! अहो, जज्जसाहेब तर इतके गरम झाले होते कीं,–तें कशाला सांगूं आतां ? उगीच तुम्हांला भीति वाटायची. पण थोडक्यांत काय

कीं माझी आणि त्यांची अगदीं जानी दोस्ती म्हणूनच, केवळ माझ्या वशिल्यामुळं, समजलांत का मिस्टर लांडगे, तुम्ही दंडावर सुटलांत. माझ्या जागीं दुसरा एकादा फालतू वकील ठेवला असतात म्हणजे कळला असता इंगा ! काय म्हटलंत, मग आधीं खोटी आशा कशाला दाखविलीस ? अहो, आशा कसली, खात्रीच होती मला तुम्ही केस जिंकणार म्हणून ! पण ह्या खालच्या कोर्टांत मुळीं न्यायच नाहीं. अहो ! आम्ही कितीहि चांगलं कसून ' आर्ग्युमेन्ट ' केलं तरी ऐकतं आहे कोण ? बाकी मी कांहीं तुमची बाजू लढविण्यांत कसूर नाहीं केली ! अहो, मुद्दाम विलायतेहून बुकं आणवली होतीं जज्जांना कायदा दाखविण्यासाठीं ! पण जिथं आमचं ऐकून घ्यायलाच मुळीं जज्जांना फुरसत नाहीं तिथं आम्ही विलायतेंतूनच काय पण स्वर्गांतून बुकं आणलीं तरी काय उपयोग ! अहो ! जज्जसाहेब मला म्हणतात काय, कीं मिस्टर लटपटे, यू सिट् डाऊन—तुम्ही खालीं बसा ! काय म्हणतां, फिर्यादी पक्षाचं कसं जज्जांनीं ऐकून घेतलं ? अहो, ऐकतात कसले कपाळ ! दोन्ही बाजू ऐकून का निकाल दिला आहे त्यांनीं ? दिली असेल भरपूर दक्षिणा फिर्यादीच्या वकिलांनीं जज्जसाहेबांना अन् दुसरं काय ? अहो, दाम करी काम ! काय ? तुम्हींहि दक्षिणेसाठीं दोनशें रुपये माझ्याजवळून घेतले होते म्हणतां ? तें खरं हो ! मीं घेतले

होते, अन् दिलेहि त्याप्रमाणें मीं साहेबांना, पण प्रतिपक्षानें शेंदोनशें अधिक दिले असतील! तरी मीं म्हणत होतों तुम्हांला, कीं त्यांचं पोट मोठं आहे, त्यांना एवढे पुरायचे नाहींत म्हणून! पण तुम्हांला तें पटलं नाहीं. काय म्हटलंत? सगळं घर फिर्यादीपायींच धुवून नेल्यावर मग खायचं काय? वा! लांडगे, हें काय बोलतां तुम्ही! अहो, घरदारच काय पण प्राण गेला तरी बेहत्तर, पण आपण प्रतिपक्षाचा पिच्छा सोडायचा नाहीं. अहो, अशा निश्चयानं लढावं तेव्हां कुठं जय मिळतो. म्हटलं आहे ना कायसं गीतेंत—तें जाऊं द्या. काय म्हणत होतों मी, कीं ज्याचं पैशाचं पारडं जड त्याच्या बाजूचा न्याय व्हायचा हें ठरलेलंच. काय म्हटलंत? मग मला इतके खोटे साक्षीदार आणायला कशाला लावलेत? हें काय विचारतां मिस्टर लांडगे? अहो, साक्षीपुराव्याशिवाय कोर्टांत एक पाऊल तरी पुढें पडेल का? अन् तुमची बाजूच मुळीं मुळांत लंगडी, मग खोट्याचं खरं करायला जितके साक्षीदार आणावे तेवढे थोडेच! काय म्हणतां, निष्कारण त्यांना पैसे चारावे लागले? अहो, निष्कारण कसे? त्यांनीं खोट्या साक्षी नाहीं का दिल्या? अन् पुन्हां वरच्या कोर्टांतहि द्याव्या लागतीलच. काय, आतां वरच्या कोर्टाबिर्टांत नाहीं जायचं म्हणतां? अहो, असं कुठं झालं आहे? तुम्ही एवढे छातीचे, अन् वरच्या कोर्टांत जायला भितां?

अहो, पहा तर खरी माझी करामत ! नाहीं तुम्हांला यश मिळवून दिलं तर पुन्हां कोर्टाची पायरी चढणार नाहीं. उगीच नाहीं म्हटलं ! हा नांवाचा लटपटे वकील आहे ! अन् आतां मी काय खुबी करणार आहे माहीत आहे का ? त्याला थोडा अधिक खर्च येईल, पण आपलं काम फत्ते होईल. मी मुळीं आतां आधींच मोठ्या जज्जसाहेबांना घरीं भेटून—मला चांगलेच ओळखतात ते—खरे साक्षीदार कोणते, खोटे कोणते, कोणाची उलटतपासणी घेऊं द्यायची, कोणाची घेऊं द्यायची नाहीं तें सारं त्यांना सांगून ठेवणार आहें. अन् त्याचबरोबर त्यांना एक पांचशेंची नोट—काय म्हणतां ? माझ्याजवळ आतां एक पैहि नाहीं ? अहो, असं म्हणून कसं चालेल ? येवढी केस जिंकलीत कीं पैसेच पैसे ! तोंपर्यंत काढा कोणाचं तरी कर्ज. काय म्हणतां, वरच्या कोर्टांत केस जिंकली तरच तुमची फी देईन ? अहो, केस तर तुम्ही जिंकणारच. अन् माझी फी काय कोठें पळून कां जाते आहे ? पण पैशाची जरा निकड आहे म्हणून आतांच हवेत. अहो, चिरंजीव गेले आहेत ना विलायतेला बॅरिस्टर व्हायला ! त्यांना धाडावे लागतात महिना तीनशें रुपये. काय म्हणतां, तुमच्या नादीं लागूनच मला दंड झाला ? अहो, सांगितलं ना तुम्हांला कीं माझ्यासारखा नामांकित अन् जज्जांच्या गळ्यांतला ताईत असा वकील मिळाला म्हणून दंडावर भागलं,

नाहींतर असले खोटे कागद अन् साक्षीदार तयार केल्याबद्दल खडी फोडायला जावं लागतं, समजलांत ! काय म्हणतां, तुम्हींच हें सारं शिकवलंत ? अहो, तें सारं तुमच्या बचावा-साठींच ना ? ज्याचं करावं बरं तें म्हणतं माझंच खरं. अन् असं पहा मिस्टर लांडगे ! या सरकारला कांहीं अक्कल का आहे ? अहो, महात्मा गांधी सारख्यांना तें तुरुंगांत घालतं, अन् तें सुद्धां गुन्हा केल्याशिवाय. तुम्ही तर काय, बोलूनचालून अट्टल—काय हो, उठलांतसे ? उद्यां येतों म्हणतां ? बरं, या. येतांना तेवढे फीचे पैसे आणायला विसरूं नका हं.

